महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक - मभाषा १०८३/२५१४/प्र-७/२०,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२, दिनांक २३ मार्च १९८३.

पहा :- शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक- मभाषा- १०८१/१६१०/६४-वीस, दिनांक २२-७-१९८१.

## परिपत्रक

विभागीय व जिल्हास्तरावरील शासकीय कार्यालयातील राजभाषा मराठीच्या वापराचा आढावा घेण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. मराठीच्या वापराच्या दृष्टीने सर्व शासकीय कार्यालयांची तपासणी विभागीय सहायक भाषा संचालकांनी करावी व तत्संबंधीचे आपले अहवाल शासनाला सादर करावेत असे ठरविण्यात आले आहे.

विभागीय सहायक भाषा संचालकांना त्यासाठी त्यांच्या कार्यक्षेत्रातील जिल्ह्यात प्रवास करण्याची परवानगी देण्यात येत आहे. कार्यालयांच्या तपासणीचे हे काम, त्यांनी आपली नेहमीची कामे सांभाळून करावयाचे आहे.

जिल्हा स्तरावरील शासकीय कार्यालयांच्या पाहणीच्या संबंधात जिल्हाधिकाऱ्यांनी त्यांच्या जिल्ह्यातील सर्व शासकीय कार्यालयांना सहायक संचालकांना आवश्यक ती माहिती पुरविण्याबाबत सूचना द्याव्यात. तसेच त्यांना पाहणी करण्यासंबंधात आवश्यक ते सर्व सहकार्य द्यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

र. रा. कुलकर्णी,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक,
सर्व मंत्री, राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक,
सर्व सचिव, मंत्रालयीन विभाग,

(पृ. मा. प.)

प्रबंधक, मूळ न्यायशाखा, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने),

प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई (पत्राने),

सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने),

सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई (पत्राने),

महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई,

महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर,

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

कला संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,

सचिव, माध्यमिक शालान्त प्रमाणपत्र परीक्षा मंडळ, पुणे,

महाराष्ट्र शासनाच्या अधिपत्याखालील सर्व मंडळे/महामंडळे,

आयुक्त, मुंबई कामगार कल्याण मंडळ, मुंबई,

निरनिराळ्या मंत्रालयीन विभागाखालील इतर सर्व विभागाध्यक्ष व कार्यालय प्रमुख,

सर्व मंत्रालयीन विभाग,

महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मुंबई,

सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,

निवड फाईल (२ प्रती).

------x-----